आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०१८-१९ या वर्षाकरीता पेसा ग्रामपंचायतींकरीताच्या अबंध निधीचे वितरण...

महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र. क्र. ०१ /का-०६

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय, विस्तार इमारत,मुंबई-४०० ०३२

तारीख:- १० ऑक्टोंबर, २०१८.

**वाचा**

१) शासन निर्णय, आ.वि.वि. क्रमांकः पेसा-२०१५/प्र.क्र.१९/का-१७ दि.२१.०४.२०१५

२) शासन निर्णय, आ.वि.वि क्रमांकः पेसाअ-२०१५/प्र.क्र.९८/का-१७ दि.२१.०८.२०१५

३) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८.

**प्रस्तावना -**

राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना आदिवासी घटक कार्यक्रम वार्षिक नियतव्ययाच्या ५% निधी उपलब्ध करुन देण्याबाबत (पेसा ग्रामपंचायतींना ५ % थेट निधी योजना) संदर्भ क्र. ०१ येथील दिनांक २१.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०१८-१९ करीता या योजनेसाठी लेखाशिर्ष (२५०१ २९७१) खाली रु.२६७८८.५९ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला असुन त्यापैकी वाचा क्र.३ नुसार अर्थसंकल्पीत निधीच्या ७० % च्या प्रमाणात रु. १८७५२.०१३ लाख इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास उपलब्ध आहे. सदर निधीचे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे :-

**शासन निर्णय : -**

राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) ग्रामपंचायतींना ५ % थेट निधी योजना लेखाशिर्ष (२५०१ २९७१) अंतर्गत सन २०१८-१९ करीता सद्यस्थितीत अर्थसंकल्पीत निधीच्या ७० % प्रमाणात रु.१८७५२.०१३ लाख (अक्षरी रुपये एकशे सत्त्याऐंशी कोटी बावन्न लाख एक हजार तीनशे फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा सहसचिव (कार्यासन १७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदरचा निधी वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरुन अनुसूचित क्षेत्रांमधील ग्रामपंचायतींना थेट वितरीत करण्यात येत असल्याने त्याकरीता सहसचिव (कार्यासन १७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी व लेखा अधिकारी, रोख शाखा, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील .

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक२०१८१००९१७००३५६६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.10.10 11:06:29 +05'30'

(रविंद्र दि. औटे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
२. सचिव,ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व पेसा जिल्हे)
५. सहसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कक्ष अधिकारी (कार्यासन-१७) / लेखाधिकारी (रोखशाखा), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.